विदर्भ, मराठवाडा, उत्तर महाराष्ट्र, डी व डी+ क्षेत्रातील औद्योगिक ग्राहकांच्या वीजदर सवलतीबाबत.

# महाराष्ट्र शासन

**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०१५/प्र.क्र.२३८/ऊर्जा-५**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : ०६ फेब्रुवारी, २०१९.

**वाचावे :** १. शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०१५ /प्र.क्र.२३८/ऊर्जा-५ दिनांक २९.०६.२०१६

२. शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०१५ /प्र.क्र.२३८/ऊर्जा-५ दिनांक २४.०३.२०१७

३. शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०१५ /प्र.क्र.२३८/ऊर्जा-५ दिनांक २३.११.२०१७

**प्रस्तावना :**

विदर्भ, मराठवाडा, उत्तर महाराष्ट्र, डी व डी+ क्षेत्रातील औद्योगिक ग्राहकांना वीज दरात सवलत देण्याबाबत शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०१५/प्र.क्र.२३८/ऊर्जा-५ दिनांक २९.०६.२०१६, २४.०३.२०१७ व २३.११.२०१७ अन्वये आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. दिनांक ३१.१०.२०१७ च्या मंत्रीमंडळ उपसमितीच्या बैठकीतील निर्णयानुसार राज्यातील पूर्णत: आदिवासी उपयोजना तालुक्यातील डी+ क्षेत्रातील औद्योगिक ग्राहकांना मराठवाडयातील औद्योगिक ग्राहकांप्रमाणे केवळ कार्यक्षमतेवर आधारित वीजदर सवलत दिनांक ०१.०४.२०१६ पासून लागू करण्याबाबत निर्णय घेण्यात आला. त्यानुसार शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१५/प्र.क्र.२३८/ऊर्जा-५ दिनांक २३.११.२०१७ अन्वये आदेश निर्गमित करण्यात आले. औद्योगिक ग्राहकांना देण्यात येणाऱ्या वीजदर सवलतीमध्ये कार्यक्षमतेवर आधारित तसेच इंधन समायोजन आकारामध्ये सवलत या सवलतींचा समावेश असल्याने राज्यातील पूर्णत: आदिवासी उपयोजना तालुक्यातील डी+ क्षेत्रातील औद्योगिक ग्राहकांना मराठवाडा विभागातील औद्योगिक ग्राहकांप्रमाणे या दोन्ही सवलती देणे आवश्यक आहे.

सद्यस्थितीत विदर्भ, मराठवाडा, उत्तर महाराष्ट्र, डी व डी+ क्षेत्रातील नवीन व कार्यरत उद्योगांना दिनांक ०१.०४.२०१६ पासून वीजदरात सवलत देण्यात येते. परंतु विस्तारीत उद्योगांना अद्याप सवलत देण्यात येत नाही. विस्तारीत उद्योगांबाबत महावितरण कंपनीने काही मुद्दयांबाबत शासनाकडून स्पष्टीकरण मागितले आहे.

उपरोक्त मुद्दयांबाबत दिनांक ०१.११.२०१८ रोजी मंत्रीमंडळ उपसमितीच्या बैठकीत सविस्तर चर्चा करण्यात आली. चर्चेअंती उपसमितीने घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने पुढीलप्रमाणे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

## शासन निर्णय:

१. राज्यातील पूर्णत: आदिवासी उपयोजना तालुक्यातील डी+ क्षेत्रातील औद्योगिक ग्राहकांना मराठवाडयातील औद्योगिक ग्राहकांप्रमाणे इंधन समायोजन आकार सवलत दिनांक ०१.०४.२०१६ पासून लागू करण्यात यावी.

२. विदर्भ, मराठवाडा, उत्तर महाराष्ट्र, डी व डी+ क्षेत्रातील विस्तारीत उद्योगांना नवीन उद्योगांची सवलत देतांना पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

(१) जिल्हा उद्योग केंद्र किंवा उद्योग संचालनालयाने दिलेल्या पात्रता प्रमाणपत्रावर व्यावसायिक उत्पादन (CoP) सुरू झाल्याची तारीख दिनांक ०१.०४.२०१६ नंतर असल्यास अश्या उद्योगांना नवीन व अस्तित्वातील विस्तारीत उद्योगाच्या सवलतीसाठी पात्र ठरविण्यात यावे.

(२) दिनांक २३.११.२०१७ पासून मुक्त प्रवेशामधून महावितरण कंपनीकडे आलेल्या ग्राहकाने वीज क्षमता वृध्दी (Contract Demand) न केल्यास परंतु वीज वापरात वाढ झाल्यास सदर ग्राहक वीजदर सवलतीस पात्र राहणार नाहीत. परंतु अश्या औद्योगिक ग्राहकाने वीज क्षमता वृध्दी केल्यास व वीज वापरात वाढ झाल्यास सदर ग्राहक वीजदर सवलतीस पात्र राहील.

(३) दिनांक २३.११.२०१७ नंतर जर एखादा औद्योगिक ग्राहक मुक्त प्रवेशामधून पूर्णपणे महावितरण कंपनीकडे आल्यास व त्याने वीज करार मागणी (MSEDCL + OA) वाढविल्यास अशा ग्राहकाच्या चालू वर्षाच्या मासिक वीज वापराची तुलना मागील वर्षाच्या त्या-त्या महिन्याच्या (MSEDCL च्या) वीज वापराशी करावी.

(४) कार्यरत उद्योगाला विस्तारीत उद्योगाची सवलत देतांना त्या महिन्याच्या महावितरणच्या वीज वापराची तुलना विस्तार करण्यापूर्वीच्या वर्षाच्या त्याच महिन्याच्या महावितरणच्या वीज वापराशी करावी व वाढीव वापरावर सवलत देय राहील.

(५) कार्यरत उद्योगाने विस्तारीत उद्योगासाठी वीज क्षमता (Contract Demand) वृध्दी न केल्यास परंतु दिनांक ०१.०४.२०१६ नंतर महावितरणच्या वीज वापरात वाढ झाल्यास व सदर ग्राहकास जिल्हा उद्योग केंद्र किंवा उद्योग संचालनालयाने पात्रता प्रमाणपत्र दिले असल्यास अश्या कार्यरत उद्योगांना विस्तारीत उद्योगाची वीजदर सवलत देतांना त्या महिन्याच्या वीज वापराची तुलना विस्तार करण्यापूर्वीच्या वर्षाच्या त्याच महिन्याच्या महावितरणच्या वीज वापराशी करावी.

(६) कार्यरत उद्योगाने केलेली महावितरणच्या वीज वापरातील वाढ व मुक्त प्रवेशातून महावितरणकडे आलेल्या औद्योगिक ग्राहकाने केलेली महावितरणच्या वीजवापरातील वाढ याबाबत महावितरण कंपनीने पडताळणी करुन त्यास विस्तारीत उद्योगाची सवलत द्यावी.

(७) कार्यरत उद्योगांना नवीन उद्योगाच्या सवलतीकरिता अनुज्ञेय वाढीव वीज वापराच्या सवलतीचे त्रैमासिक समायोजन वीज देयकात करण्यात यावे.

(८) शासनाच्या दिनांक २५.०४.२०१८ च्या पत्रासोबत अतिरिक्त उद्योग संचालक यांनी उद्योग सहसंचालक व महाव्यवस्थापक यांना अग्रेषित केलेले "Eligibility Certificate for Mega Project" हे पात्रता प्रमाणपत्र नवीन, विस्तारीत व मुक्त प्रवेशातून महावितरण कंपनीकडे पूर्णत: येणाऱ्या ग्राहकास वीजदर सवलत देण्याकरिता सध्या ग्राहय धरण्यात यावे. सदर पात्रता प्रमाणपत्रामध्ये महावितरण कंपनीने सुचविल्यानुसार आवश्यक ते बदल करून सुधारित पात्रता प्रमाणपत्र उद्योग संचालनालयाच्या सल्ल्याने निर्गमित करण्यात येईल.

३. वरील निर्णयानुसार महावितरण कंपनीने अंमलबजावणी करुन शासनास अहवाल सादर करावा.

४. हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९०२०६१४३६०७०२१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Prashant Pundalik Badgeri

Digitally signed by Prashant Pundalik Badgeri
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ae61ab0caff4e0f24ac492ed7902d55ccf49e93124a5c1327133a6da9db8c748, serialNumber=ec955e2d360e1fddb6abac58a907419053beeceb5dbac48a78c89c588ff71bef, cn=Prashant Pundalik Badgeri
Date: 2019.02.06 14:41:01 +05'30'

**(प्र.पुं. बडगेरी)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत:**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३) मा. मंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
४) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ सचिवालय,विधानभवन, मुंबई.
५) मा. राज्यमंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
६) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) अपर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) सर्व मंत्रालयीन विभाग
१०) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
११) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर
१२) महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई
१३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१४) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१५) अवर सचिव (ऊर्जा-३), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) कक्ष अधिकारी (१४६१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) कक्ष अधिकारी, (व्यय-१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१८) निवड नस्ती (ऊर्जा-५), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने.